**अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतीपूर्ती या योजनेसाठी निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पुरवणी २०१९/प्र.क्र. ६०/ एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३० मार्च, २०२०

**संदर्भ :-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र. एफईडी १५९२ /१२०२ /११३२ / साशि-५, दिनांक १८ ऑक्टोबर,१९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.४७ /एसडी-५, दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९.
३. वित्त विभागाचे शासन परीपत्रक क्र. अर्थसं२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३; दि. ०८.०७.२०१९.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.१५ फेब्रुवारी,२०२०.
५. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.अनुवि ४९१९/(३२/१९)/अर्थसंकल्प, दि.१८ मार्च,२०२०.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयानुसार राज्यातील टंचाईग्रस्त भागातील विद्यार्थ्यांची परीक्षा फी माफीची योजना कार्यान्वीत आहे. सदर योजनेत संदर्भ क्र. (२) च्या शासन निर्णयान्वये विद्यार्थ्यांना फीची प्रतीपूर्ती /माफ करण्यात येणाऱ्या परीक्षा शुल्काच्या रकमेत प्रात्यक्षिक शुल्क, गुणपत्रिका शुल्क, गुणवत्ता प्रमाणपत्र शुल्क इ. समाविष्ट करण्यात आला आहे. तसेच विद्यार्थ्यांना प्रतीपूर्ती करण्याच्या कार्यपद्धतीत सुधारणा करण्यात आली आहे. अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतीपूर्ती या योजनेसाठी सन २०१९-२० च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर रक्कमेपैकी ८० टक्के रक्कम वित्त विभागाच्या मान्यतेनुसार संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे. तसेच उर्वरीत संदर्भ क्र.(५) येथील शासन निर्णयान्वये वितरीत २० टक्के रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माहे डिसेंबर, २०१९ मधील हिवाळी अधिवेशनात, विद्यार्थाच्या परीक्षा शुल्काची प्रतीपूर्ती करण्यासाठी रु.२१,३६,७०,०००/- एवढ़ी तरतूद पुरवणी मागणी द्वारे मंजूर करण्यात आली आहे. या पैकी रु.१७,०९,३६,०००/- (रुपये सतरा कोटी नऊ लाख छत्तीस हजार फक्त) (८० टक्के ) इतका निधी दि.१५ फेब्रुवारी,२०२० च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. उर्वरीत रु.४,२७,३४,०००/- (रुपये चार कोटी सत्तावीस लाख चौत्तीस हजार फक्त) (२० टक्के) निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणाऱ्या खर्चासाठी मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, (०४) अवर्षणग्रस्त भागातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी (०४)(०१) अवर्षणग्रस्त खेडयातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतिपूर्ती (कार्यक्रम), ३४शिष्यवृत्त्या/विद्यावेतने, (२२०२२५८८) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक,शिक्षण संचालनालय, पुणे यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.याबाबतीत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे/शासन निर्णय/शासन परीपत्रक यामधील सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील. तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि. ०८.०७.२०१९ मधील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. २२९/२०२०/व्यय-५, दि.१७.०३.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३३०१५१४०२९५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.03.30 15:17:19 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
२. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद)
३. अप्पर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
४. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक,शिक्षण संचालनालय, पुणे
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १व २ मुंबई व नागपूर
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २ मुंबई व नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे.
१०. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
११. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
१४. निवड नस्ती.